**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**क्रमांकः प्रतिनि-१०२०/प्र.क्र.६१/का.१४**

हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा रोड

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दिनांक: २४ डिसेंबर, २०२१

## आदेश

श्री.प्रल्हाद शंकर रोडे, अवर सचिव, जलसंपदा यांची नगर विकास विभागाच्या अधिपत्याखालील स्मार्ट सिटी प्रोजेक्ट, कल्याण-डोंबिवली महानगरपालिका, जि.ठाणे यांच्या आस्थापनेवरील "मुख्य कार्यकारी अधिकारी" या पदावर प्रथमत: **एक** वर्षासाठी खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात येत आहे.

अ) श्री.प्रल्हाद शंकर रोडे, अवर सचिव हे ज्या तारखेला प्रतिनियुक्तीच्या पदावर रूजू होतील त्या तारखेपासून प्रतिनियुक्तीच्या सेवेचा प्रारंभ होईल आणि ती सेवा ज्या तारखेला ते आपल्या शासकीय पदाचा कार्यभार पुन्हा स्विकारतील त्या तारखेला समाप्त होईल.

ब) जर त्यांची सेवा लोकसेवेच्या हिताच्या दृष्टीने शासनाला आवश्यक वाटली तर प्रतिनियुक्तीचा कालावधी संपण्यापूर्वी कोणत्याही वेळी त्यांना परत बोलावून घेण्याचा अधिकार शासन/सक्षम प्राधिकाऱ्यास राहील.

क) जर त्यांची सेवा स्वीयेतर नियोक्त्याला आवश्यक वाटली नाही तर त्यांना मुळ विभागाकडे परत पाठविण्याची मुभा स्वीयेतर नियोक्त्याला राहील. मात्र याप्रमाणे परत पाठविण्यापूर्वी स्वीयेतर नियोक्त्याने शासनाला/सक्षम प्राधिकाऱ्याला तीन महिन्यांची नोटीस दिली पाहिजे; आणि

ड) त्यांनी मूळ विभागाकडे परत जाण्याचा आपला उद्देश आहे अशी कमीत कमी तीन महिन्यांची लेखी नोटीस शासनाला / सक्षम प्राधिकाऱ्याला दिल्यानंतर त्यांना मूळ विभागाकडे परत येण्याची मुभा राहील.

२. महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा... इ.) नियम १९८१ मधील नियम ४० (परिशिष्ट दोन व तीन) मधील तरतुदी विचारात घेऊन जलसंपदा विभाग व नगर विकास विभाग यांनी श्री.प्रल्हाद शंकर रोडे यांच्या प्रतिनियुक्तीबाबतच्या अटी व शर्ती आपआपसात ठरवाव्यात.

३. श्री.प्रल्हाद शंकर रोडे, अवर सचिव यांच्या इतर सर्व प्रशासकीय बाबी जलसंपदा विभागामार्फत हाताळण्यात येतील.

४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११२२४१२५७१९१७०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Gajanan Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ada8a72725a47b4f0, serialNumber=54b11b1ccbdc577d71dce3b313c3fef5dc2ad659e360f73b682d6b6fccb8aecf, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2021.12.24 12:58:56 +05'30'

**(ग.भि.गुरव)**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन.

२) अ.मु.स (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.

३) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.

४) सह/उप सचिव (नगर विकास विभाग/जलसंपदा विभाग/सामान्य प्रशासन विभाग (कार्या- २१), मंत्रालय, मुंबई.

५) आयुक्त, कल्याण-डोंबिवली महानगरपालिका, जि.ठाणे.

६) श्री.प्रल्हाद शंकर रोडे, अवर सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई. (प्रशासकीय विभागामार्फत)

७) कार्या.१४ संग्रहार्थ.